अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांतील मान्यवर व्यक्तींचे स्मारक बांधणे तसेच अनुसूचित जातीसाठी सांस्कृतिक व ऐतिहासिक दृष्ट्या महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे व अनुसूचित जातीच्या सांस्कृतिक व नीतिमुल्यांवर आधारित विकास साधणाऱ्या प्रकल्पांसाठी स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करणे या योजनेअंतर्गत एस.एम.प्रधान फाऊंडेशन डॉ.आंबेडकर नगर, नांदेड या संस्थेच्या मौजे कवाना ता.हदगाव, जि.नांदेड येथे सांस्कृतिक सभागृह, ध्यानधारणा केंद्र, वाचनालय, अभ्यासिका कक्ष ईत्यादी प्रकल्पास मंजूरी प्रदान करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्वसेअ -२०२३/प्र.क्र.४०/बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ३० जून, २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.५.११.२०२०.

२) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र जा. क्र. सकआ/ मावक/ऐति.स्थळ/ एस.एम. प्रधान, नांदेड/ बांधकामे/२०२२-२३/का-१२/४२, दि.१०.०१.२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांतील मान्यवर व्यक्तींचे स्मारक बांधणे तसेच अनुसूचित जातीसाठी सांस्कृतिक व ऐतिहासिक दृष्ट्या महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे व अनुसूचित जातीच्या सांस्कृतिक व नीतिमुल्यांवर आधारित विकास साधणाऱ्या प्रकल्पांसाठी स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करण्याविषयीचे निकष, मार्गदर्शक तत्वांना संदर्भ क्र. १, दि.५.११.२०२० अन्वये शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. आयुक्त, समाजकल्याण पुणे यांनी संदर्भ क्र. ३ अन्वये एस.एम.प्रधान फाऊंडेशन डॉ.आंबेडकर नगर, नांदेड या संस्थेच्या मौजे कवाना ता.हदगाव, जि.नांदेड येथे सांस्कृतिक सभागृह, ध्यानधारणा केंद्र, वाचनालय, अभ्यासिका कक्ष ईत्यादी प्रकल्प उभारण्याचा रु.४,९९,४३,३९५/-(अक्षरी रुपये चार कोटी नव्यान्नव लक्ष त्रेचाळीस हजार तीनशे पंच्यान्नव फक्त) इतक्या रकमेचा प्रस्ताव मान्यतेसाठी शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने, सदर प्रस्तावास मा.मुख्यमंत्री महोदयांनी मान्यता प्रदान केली आहे. सदरील प्रस्तावास योजनेच्या निकषानुसार १०% रक्कम रू.४९,९४,३४०/- (अक्षरी रूपये एकोण पन्नास लक्ष चौऱ्यान्नव हजार तीनशे चाळीस फक्त) इतका निधी संस्थेला स्वत: खर्च करावी लागणार आहे. सदरील प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

एस.एम.प्रधान फाऊंडेशन डॉ.आंबेडकर नगर, नांदेड या संस्थेच्या मौजे कवाना ता.हदगाव, जि.नांदेड येथे सांस्कृतिक सभागृह, ध्यानधारणा केंद्र, वाचनालय, अभ्यासिका कक्ष ईत्यादी प्रकल्प उभारण्याचा रु.४,९९,४३,३९५/-(अक्षरी रुपये चार कोटी नव्यान्नव लक्ष त्रेचाळीस हजार तीनशे पंच्यान्नव फक्त) इतक्या रकमेचा प्रस्तावास योजनेच्या निकषानुसार खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. एकूण अंदाजपत्रकीय खर्चामध्ये शासनाचा हिस्सा ९० टक्के रू. ४,४९,४९,०५५/- ( चार कोटी एकोणपन्नास लक्ष एकोणपन्नास हजार पंचावन्न फक्त) इतका हिस्सा शासनाचा राहील व एस.एम.प्रधान फाऊंडेशन डॉ.आंबेडकर नगर, नांदेड या संस्थेचा १० टक्के रू.४९,९४,३४०/- (अक्षरी रूपये एकोण पन्नास लक्ष चौऱ्यान्नव हजार तीनशे चाळीस फक्त) इतका हिस्सा संस्थेचा राहील.

१) विभागाच्या दि. ५.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयातील सर्व अटी व शर्तीची पूर्तता करावी.
२) प्रकल्पाचे काम सुरू करण्यापूर्वी प्रकल्पाच्या अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, छत्रपती संभाजीनगर यांचेकडून प्रमाणित/साक्षांकित करून घेण्यात यावे.
३) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच कामास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.
४) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
५) प्रस्तावित बांधकामाची जागा सदर संस्थेच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.
६) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापूर्वी अंदाजपत्रकावर अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड व विभागाच्या वतीने प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, लातूर यांनी साक्षांकन करावे.
७) सदर वास्तुचे हस्तांतरण इतर संस्थेला करता येणार नाही किंवा जागेची व वास्तुची खरेदी- विक्री करता येणार नाही.
८) सदर वास्तुचा उपयोग व्यापारी तत्वावर करता येणार नाही.
९) शासनाच्या कार्यक्रमासाठी वा उपक्रमासाठी उपरोक्त वास्तुचा विनाशुल्क उपयोग करता येईल.

३. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयात नमूद मार्गदर्शक तत्वांचे पालन करुन एस.एम.प्रधान फाऊंडेशन डॉ.आंबेडकर नगर, नांदेड या संस्थेच्या मौजे कवाना ता.हदगाव, जि.नांदेड येथे सांस्कृतिक सभागृह, ध्यानधारणा केंद्र, वाचनालय, अभ्यासिका कक्ष ईत्यादी प्रकल्प या कामावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी सदर शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समितीची राहील. वर नमूद सर्व अटी व शर्ती एस.एम.प्रधान फाऊंडेशन डॉ.आंबेडकर नगर, नांदेड या संस्थेला मान्य असल्याबाबत करारपत्र करुन घ्यावे. शासनाच्या वतीने करारपत्रावर सही करण्यासाठी प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, लातूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, नांदेड यांनी उपरोक्त बांधकामाचा सद्य:स्थितीचा त्रैमासिक अहवाल आणि वितरीत केलेल्या निधीचे

उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना वेळोवेळी सादर करण्याची दक्षता घ्यावी.

४. सदर बांधकामावरील खर्च हा मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०५), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (०५)(०२), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (वि.घ.यो.) (२२२५ ३६३६), ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (योजनातर्गत-दत्तमत्त) या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षात मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. संदर्भ क्र.३ अन्वये, सदर योजनेअंतर्गत सहसचिव/उपसचिव(अर्थसंकल्प) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. व संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच योजनेअंतर्गत मंजूर निधीचे वितरण हे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद २ मध्ये नमूद अटीच्या अधीन काटेकोरपणे करण्याची जबाबदारी सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण , छत्रपती संभाजीनगर यांची राहील.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०७०३१२२३५७३४२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUCTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2023.07.03 12:25:43 +05'30'

**(अनिल कों.आहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
२) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, छत्रपती संभाजीनगर.
४) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, छत्रपती संभाजीनगर.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, छत्रपती संभाजीनगर.
६) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, लातूर.
८) सहायक आयुक्त, समाजकल्याण, छत्रपती नांदेड

९) जिल्हा कोषागार अधिकारी, पूणे/ लातूर /मुंबई
१०) अध्यक्ष/सचिव, एस.एम.प्रधान फाऊंडेशन डॉ.आंबेडकर नगर, नांदेड.
११) निवडनस्ती (बांधकामे)